**सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनियुक्तीने**
**नियुक्ती करण्यासंदर्भात नियुक्ती**
**प्राधिकारी घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निप्राघो २०१८/प्र.क्र.९५/सेवा-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि. ११/१२/२०१८.

वाचा : साप्रवि शा.नि.क्र. एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२९०/कार्या. १२ दि. १९/११/२०१६.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासन सेवेतील गट "अ" आणि गट "ब" (राजपत्रित) अधिकाऱ्यांच्या तसेच गट "ब"(अराजपत्रित), गट "क" आणि गट "ड" मधील कर्मचाऱ्यांच्या सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात नियुक्ती प्राधिकारी निश्चित केले आहेत. तसेच त्या शासन निर्णयात गट "ब( अराजपत्रित), गट "क" आणि गट "ड" मधील पदे यासाठी पदनिहाय नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याचे आदेश निर्गमित करण्याबाबत प्रशासकीय विभागांना सूचित केले आहे. यानुसार सार्वजनिक बांधकाम विभागातील नियुक्ती प्राधिकारी निश्चित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सूचित केल्यानुसार गट-ब ( अराजपत्रित), गट-क आणि गट-ड मधील कर्मचाऱ्यांच्या सरळसेवेने, पदोन्नतीने वा प्रतिनियुक्तीने नेमणूका/पदस्थापना यासंदर्भात अंतिम निर्णय घेण्यास्तव या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे नियुक्ती प्राधिकारी निश्चित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदे | नियुक्ती प्राधिकारी |
|---|---|---|
| १. | गट-ब (अराजपत्रित) आणि गट-क कर्मचारी (तांत्रिक) | मा. मंत्री (सा.बां.) |
| अ) | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य)<br>कनिष्ठ अभियंता (विद्युत) | |
| आ) | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | नियुक्तीसाठी मंडळाचे अधीक्षक अभियंता/ पदोन्नतीसाठी परिमंडळाचे अधीक्षक अभियंता |
| २. | गट-ब (अराजपत्रित) कर्मचारी (अतांत्रिक) (सहाव्या वेतन आयोगानुसार पे बँड रु. ९३००-३४८०० ग्रेड पे रु ४४०० ते ५०००/- | नियुक्तीसाठी मंडळाचे अधीक्षक अभियंता/ पदोन्नतीसाठी परिमंडळाचे अधीक्षक अभियंता |
| ३. | गट-क कर्मचारी (अतांत्रिक) (सहाव्या वेतन आयोगानुसार पे बँड रु. ५२००-२०२०० + ग्रेड पे १९०० ते २८०० तसेच पे बँड रु. ९३००-३४८०० ग्रेड पे रु ४२०० ते ४४००/- | नियुक्तीसाठी मंडळाचे अधीक्षक अभियंता/ पदोन्नतीसाठी परिमंडळाचे अधीक्षक अभियंता |
| ४. | गट-ड कर्मचारी पे बँड रु. ४४४०-७४४० + ग्रेड पे १६०० ते १८००/- | नियुक्तीसाठी मंडळाचे अधीक्षक अभियंता/ पदोन्नतीसाठी परिमंडळाचे अधीक्षक अभियंता |

३. वरील नियुक्ती प्राधिकारी हे सरळसेवेने, पदोन्नतीने वा प्रतिनियुक्तीने करावयाच्या नेमणुका/ पदस्थापनेच्या प्रकरणांवर अंतिम निर्णय घेण्यासाठी असतील. मात्र बदली करण्यासंदर्भात विभागाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या अधिसूचनेन्वये घोषित केलेले सक्षम प्राधिकारी अंतिम निर्णय घेतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८१२१११४४९५४०२१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayant Sharad Sagade

Digitally signed by Jayant Sharad Sagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a6fd5f8313a5dbbc809e855be10e14964ddc66d66f20f36d4d55bcfb56ceb55, serialNumber=5caf6324c416282449c4078681a5b8972eb1d149920d77cc78a41448df59c4c9, cn=Jayant Sharad Sagade
Date: 2018.12.11 14:54:10 +05'30'

**( ज. श. सागडे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री (सा.बां.)(सा.उ. वगळून) यांचे खाजगी सचिव,
२) मा. मंत्री (सा.बां.)(सा.उ.) यांचे खाजगी सचिव,
३) मा. राज्यमंत्री (सा.बां.) (सा.उ. वगळून) यांचे खाजगी सचिव,
४) प्रधान सचिवांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (बांधकामे) स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (रस्ते) स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
८) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
९) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, मुंबई.
१०) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
११) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
१२) संचालक, उपवने व उद्याने, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
१३) कार्यासन (सेवा-४) संग्रहार्थ.